**सोलापूर जिल्हा परिषदेतील कनिष्ठ अभियंता या पदावरील पुनर्नियुक्ती देण्यात आलेल्या कर्मचाऱ्यांची नियुक्तीपासून पुनर्नियुक्ती पर्यंतच्या कालावधीतील सेवासातत्य देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्र.न्यायप्र.२०२३/प्र.क्र.२८-/आस्था-१०**

बांधकाम भवन,२५ मर्झबान पथ,
फोर्ट, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :-१० मार्च, २०२३

**संदर्भ :-** (१) शासन निर्णय ग्रामविकास व जलसंधारण विभाग, क्रमांक: क्र. नियुक्ती-१०८९/सीआर९६०/८९/१२, दिनांक ११/१२/१९८९

(२) ग्राम विकास विभाग, शासन निर्णय क्र. न्यायप्र.२०११/प्र.क्र.२५-अ/आस्था-१०, दिनांक १०.०३.२०२३

**प्रस्तावना :-** उपरोक्त संदर्भाधीन शासन निर्णयान्वये जिल्हा परिषद परभणी येथील ९ कनिष्ठ अभियंता यांच्या सहायकांना त्यांनी केलेल्या चार वर्षांच्या सेवेचा अनुभव विचारात घेऊन त्यांच्या बाबतीत सहानुभूतीचा दृष्टीकोन ठेवून पुनर्नियुक्ती देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. तथापि, या शासन निर्णयातील पुनर्नियुक्तीच्या अट क्र.४ नुसार सदर नियुक्ती ज्या दिवसापासून देण्यात येईल, ती नियुक्ती पूर्णत: नवीन असेल असे नमूद करण्यात आले आहे.

या संदर्भात संबंधित कर्मचाऱ्यांपैकी श्री. मारूती विठ्ठलराव बोबडे व अन्य तसेच श्री. प्रभाकर श्रीपती भवाळ यांनी मा. उच्च न्यायालय मुंबई यांचे औरंगाबाद खंडपीठ येथे रिट याचिका क्र.४६७४/२०११ व ४६७५/२०११ दाखल केल्या होत्या. याचिकाकर्ता ज्या अटी-शर्तींवर जिल्हा परिषद परभणी येथे कार्यरत होते त्याच अटी- शर्तींवर जिल्हा परिषद जालना व औरंगाबाद येथे कार्यरत असलेल्या अन्य कनिष्ठ अभियंत्यांचे सहायक यांना सेवा सातत्याचा लाभ देण्यात आला आहे. परंतू या याचिकर्त्यांच्या सह नियमित नियुक्ती देण्यात आलेल्या अनुक्रमे (१) श्री. जेउरकर भास्कर केशवराव, कनिष्ठ अभियंता, जिल्हा परिषद परभणी व (२) श्री. शेख अल्लाउद्दीन नबीसाब, कनिष्ठ अभियंता, जिल्हा परिषद लातुर यांना वरील संदर्भ क्र.२ मधील आदेशानुसार उपरोक्त लाभ देण्यात आलेला नाही. अन्य जिल्हा परिषदांमधील कर्मचाऱ्यांप्रमाणे सेवा सातत्य मिळण्याबाबत याचिकाकर्ता यांनी निवेदन सादर केल्यास याचिकाकर्ता यांना अन्य समकक्ष कनिष्ठ अभियंत्यांचे सहायक यांच्याप्रमाणे सेवासातत्य देण्याबाबत शासनाने विचारपूर्वक ६ महिन्यांच्या आत निर्णय घ्यावा, असे आदेश मा. उच्च न्यायालयाने रिट याचिका क्र.४६७४/२०११ व ४६७५/२०११ मध्ये दिनांक २२/०२/२०१७ रोजी

दिले आहेत. सदर कर्मचारी हे वर्ग-३ चे कर्मचारी असल्याने व त्यांना करण्यात आलेल्या अतिप्रदानामध्ये ते प्रत्यक्ष दोषी नसल्याने त्यांचेकडून अतिप्रदानाची कोणतीही वसूली करण्यात येवू नये, असेही मा. न्यायालयाने आदेशात स्पष्ट केले आहे.

मा. उच्च न्यायालयाच्या उपरोक्त आदेशानुसार याचिकाकर्ता यांच्या प्रमाणे श्री. उबाळे यांनी सोलापूर जिल्हा परिषदेकडे दिनांक १६/४/१९९१ व दिनांक २१/०४/२००४ रोजी निवेदन सादर केले होते. त्यानुसार जिल्हा परिषद सोलापुर यांनी श्री. सुधाकर उबाळे कनिष्ठ अभियंता यांना सेवा सातत्य देण्याबाबतचा सविस्तर प्रस्ताव शासनास सादर करण्यात आला होता. सदर प्रस्तावाचा सर्वांकष विचार करून त्यानुषंगाने शासनाने पुढील निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

मा. उच्च न्यायालय मुंबई यांचे औरंगाबाद खंडपीठ येथे दाखल रिट याचिका क्र.४६७४/२०११ व ४६७५/२०११ मधील आदेश विचारात घेता संदर्भाधीन शासन निर्णय दिनांक २७/०७/२००० मधील अट क्र.४ रद्द करून उपरोक्त याचिकेतील याचिकाकर्ता यांच्याप्रमाणे खालील कर्मचाऱ्यांना त्यांच्या मूळ नियुक्तीपासून ते पुनर्नियुक्तीपर्यंतच्या कालावधीतील सर्व सेवा प्रयोजनार्थ सेवासातत्य देण्यास संदर्भ २ येथील पत्रान्वये शासन मान्यता देण्यात आली आहे.

२. विधी व न्याय विभाग, यांचे दिनांक २८.२.२०१७ रोजीच्या परिपत्रकानुसार दिलेल्या सूचना खालीलप्रमाणे आहे. उत्तर प्रदेश राज्य शासन आणि इतर विरुद्ध अरविंद कुमार श्रीवास्तव यांच्या बाबतीत माननीय सर्वोच्च न्यायालय यांनी २०१५ मध्ये नोंदवले (१) SCC ३४७ अन्वये मार्गदर्शक तत्वे घालून दिलेली आहेत ती खालीलप्रमाणे आहेत :-"Normal rule is that when a particular set of employees is given relief by the Court, all other identically situated persons need to be treated alike by extending that benefit. Not doing so would amount to discrimination and would be violated of Article % of the Constitution of India. This principle needs to be applied in service matters more emphatically as the service jurisprudence evolved by this Court from time to time postulates that all similarly situated persons should be treated similarly. Therefore, the normal rule would be that merely because other similarly situated persons did not approach the Court earlier. they are not to be treated differently". मा. सर्वोच्च न्यायालयाने दिलेल्या वरील आदेशाच्या अनुषंगाने प्रशासकीय प्रकरणात सर्व विभागांनी निर्णय घ्यावेत असे स्वयंस्पष्ट निर्देश दिलेले आहेत.

३. सोलापूर जिल्हा परिषद यांचे आदेश दिनांक ०१/१२/२००५ अन्वये, सोलापूर जिल्हा परिषदेतील कार्यरत कर्मचारी श्री. सुधाकर उबाळे, यांना कनिष्ठ अभियंता या मूळ पदावर पुनर्नियुक्ती देण्यात आलेली आहे. त्यामुळे, श्री. उबाळे यांना कनिष्ठ अभियंता पदावरील मूळ नियुक्तीचा दिनांक

०८/१०/१९८६ ही रोजंदारी वरील होती. त्यामुळे, श्री. उबाळे यांच्या कनिष्ठ अभियंत्याचे सहायक पदावरील नियुक्ती ऐवजी कनिष्ठ अभियंता पदासाठी दिनांक २०.०७.१९९० ते १.१२.२००५ पर्यंतच्या कालावधीतील सेवा जेष्ठता व त्यानुषंगाने काल्पनिक वेतनवाढी मंजुर करण्यात यावी. तथापी, त्यांना प्रत्यक्षात आर्थीक लाभ हा त्यांना कनिष्ठ अभियंता पदावर काम केल्याच्या दिनांकापासून लागू करण्यात यावा.

४. मा. उच्च न्यायालयाचा न्याय निर्णय, विधी व न्याय विभाग, यांचे दिनांक २८.२.२०१७ रोजीच्या परिपत्रकानुसार माननीय सर्वोच्च न्यायालय यांनी २०१५ मध्ये नोंदवले (१) SCC ३४७ अन्वये मार्गदर्शक तत्वे व जिल्हा परिषद सोलापूर यांनी श्री.उबाळे यांना कनिष्ठ अभियंता पदावर नामनिर्देशनाने दिलेली नियुक्ती विचारात घेऊन, मराठवाडयातील औरंगाबाद, जालना, लातूर व परभणी येथील कर्मचा-यांप्रमाणेच श्री. उबाळे यांच्या कनिष्ठ अभियंता पदावरील मुळ नियुक्तीच्या दिनांकापासून सर्व सेवा प्रयोजनार्थ सेवा सातत्य देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

५. शासनाच्या वरील निर्णयानुसार संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी त्यांच्या स्तरावर विहीत कार्यपद्धतीनुसार आवश्यक ती कार्यवाही करावी.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३१०१४३७२०१७२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SURESH DEORAM AMBEKAR

Digitally signed by SURESH DEORAM AMBEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=296e3c880fd1b089cf7bc9aed875e1bd95a2e8ed913596c74f7aa9e24917bc3c, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=2768FD72EB50BA92D164687191D6F9C7C412A486DDA9C76BBD82BD2EB7012517, cn=SURESH DEORAM AMBEKAR
Date: 2023.03.10 14:43:10 +05'30'

**( सुरेश आंबेकर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव.
२)मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय मुंबई.
३) मा. मंत्री (ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई.
४) मा. विधानसभा / विधानपरिषद यांचे सर्व सदस्य
५) अतिरीक्त मुख्य सचिव (ग्रामविकास व पंचायत राज) मंत्रालय मुंबई.
६) सर्व उप सचिव/ सह सचिव (ग्राम विकास विभाग)
७) विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे
८) उपायुक्त (आस्थापना), पुणे विभाग, पुणे.
९) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद सोलापूर.
१०) निवडनस्ती (आस्था-१०), ग्रामविकास विभाग.